**अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना भत्ते मंजूर करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविआ-२७२२/प्र.क्र.१००/का.१४२१.**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २६ जुलै,२०२३

**संदर्भ :** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : वेतन १०१३/प्र.क्र.६०४/प्रशासन-१, दि.२६.७.२०१३ व दि.३०.१.२०१४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८८/अर्थ-१, दि.१२.११.२०१८.
३) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक : निविआ-२७२२/प्र.क्र.१००/का.१४२१, दि.३१.०३.२०२२.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागातील अर्थसंकल्पिय कामकाजाशी संबंधित जसे की, अर्थसंकल्प कक्ष, अर्थसंकल्पीय भाषण कक्ष, साधनसंपत्ती कक्ष, कराधान कक्ष इत्यादी कक्षामधील अधिकारी/कर्मचारी यांना संदर्भाधीन क्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये भत्ते मंजूर करण्यात आले आहेत. त्यानुसार पदांच्या उतरंडीप्रमाणे मानधनाची ठोक रक्कम वेतनाव्यतिरिक्त दिली जाते. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक -२ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पातील कार्यक्रमावरील खर्चाचे समन्वयन नियोजन विभागाकडे सोपविण्यात आले आहे. यास्तव नियोजन विभागातील अर्थसंकल्प तयार करण्याच्या प्रक्रीयेमध्ये समाविष्ट असलेल्या अधिकारी / कर्मचारी यांना भत्ते मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन नियोजन विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना भत्ते मंजूर करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयात नमूद १४८१-अ, १४८२ या कार्यासनांकडून त्यांचेकडील "कार्यक्रम खर्च" योजनेबाबतची माहिती विभागातील विकास क्षेत्र कार्यासनास सादर केली जाते. तसेच कार्यासन-१४८२-अ (खासदार स्थानिक क्षेत्र विकास कक्ष) कडून कोणताही निधी अर्थसंकल्पित केला जात नाही. यास्तव संदर्भ क्रमांक-३ येथील शासन निर्णयात सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता. त्याबाबत आता पुढीलप्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वार्षिक अर्थसंकल्पामधील अविभाज्य भाग असलेला वार्षिक कार्यक्रम तयार करणे व वित्त विभागाला त्याबाबतची आकडेवारी उपलब्ध करणे या संबंधिचे काम नियोजन विभागाकडून दरवर्षी साधारणत: ऑक्टोबर ते मार्च या कालावधीत केले जाते. या कामाचे सांविधानिक महत्व व जबाबदारी तसेच हे काम विहीत कालावधीत पूर्ण करण्याचे बंधन या सर्व गोष्टी विचारात घेऊन नियोजन विभागातील कार्यक्रम प्रभागातील म्हणजे १) कार्या. १४११, १४१२ व १४१४ २) कार्यासन-१४१६ (विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र ही विकास मंडळे अस्तित्वात नसल्याने, "विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र प्रदेशनिहाय" याबाबतचे प्रकाशन) ३) जिल्हा वार्षिक कार्यक्रमाशी संबंधित कार्या.१४८१ आणि ४) विकास क्षेत्र कार्यासने इत्यादी मधील अधिकारी/कर्मचारी यांना कराव्या लागणाऱ्या ज्यादा कामासाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे भत्ते अनुज्ञेय ठरविण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | मानधनाचा दर |
|---|---|---|
| १ | सह सचिव /उप सचिव | ₹२०,०००.०० |
| २ | अवर सचिव, सह संचालक | ₹१२,५००.०० |
| ३ | अ.मु.स./प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक | ₹१२,५००.०० |
| ४ | कक्ष अधिकारी | ₹१०,०००.०० |
| ५ | संशोधन अधिकारी, उच्चश्रेणी लघुलेखक | ₹८,५००.०० |
| ६ | सहायक कक्ष अधिकारी, सहायक संशोधन अधिकारी,निम्नश्रेणी लघुलेखक | ₹८,०००.०० |
| ७ | लिपिक-टंकलेखक | ₹६.०००.०० |
| ८ | वाहन चालक | ₹५,०००.०० |
| ९ | शिपाई, झेरॉक्स ऑपरेटर | ₹४,०००.०० |

२. भत्त्याचे दर सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पापासून अंमलात येतील.

३. यासाठी ऑक्टोबर ते मार्च या सहा महिन्यांच्या कालावधीत अधिकारी / कर्मचारी यांची उपस्थिती किमान ७५% असणे अनिवार्य आहे. जर उपस्थिती ५०% असेल तर त्यानुसार ५०% रक्कम अनुज्ञेय राहील. उपरोक्त रक्कम ठोक रकमेच्या स्वरुपात देण्यात येईल.

४. " सदर अधिकारी / कर्मचारी यांनी आपले काम समाधानकारकपणे पार पाडले आहे" अशा संबंधित कक्षाच्या प्रभारी सह सचिव / उप सचिव यांच्या प्रमाणपत्राच्या अधिन राहून सदर भत्ते मंजूर केले जातील.

५. या प्रयोजनावर होणारा खर्च **मागणी क्रमांक – ओ – ७, ३४५१, सेक्रेटरीएट आर्थिक सेवा, नियोजन विभाग (अनिवार्य) दत्तमत (३४५१०१८२), १३ कार्यालयीन खर्च** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०७२६१७०१५३३३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MILIND
RAGHUNATH
KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, pseudonym=F52EF95C5AE57B2B7645FA5EC3BC8FC14C4F892B, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2023.07.26 17:03:30 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (ले.व अ.) व (लेखापरीक्षा), मुंबई-२०
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) सह सचिव/ उप सचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अवर सचिव, रोखशाखा, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (व्यय) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती, कार्या. १४२१.